# एक कोंबडी

एक छोटेसे कर्ज मोठा बदल घडवू शकते!

लेखिका: केटी स्मिथ मिलवे; चित्रे: युजिनी फर्नांड्स



## एक छोटेसे कर्ज मोठा बदल घडवू शकते!



# एक कोंबडी

मराठी अनुवादः सुशील मेन्सन

एक व्यक्ती, एक कुटुंब, एक समाज आणि संपूर्ण जग यांच्यात एकाचवेळी बदल कसे घडून येतात, त्याची ही गोष्ट!

कोजो पश्चिम आफ्रिकेच्या घाणा देशातील एका छोट्याशा शहरात राहातो. तो आणि त्याची आई जळणाची लाकडे गोळा करून आणि विकून आपली गुजराण करतात. त्यातून त्यांना फारसा पैसा किंवा अन्न मिळत नाही. फक्त त्यांचे पोट भरते. कोजोला जेव्हा छोटेसे कर्ज मिळते तेव्हा त्याला एक कल्पना सुचते. या कर्जाच्या पैशातून एक कोंबडी विकत घ्यायची. मग त्यांना खाण्यासाठी अंडी मिळतील. थोड्याच काळात त्यांच्याकडे बाजारात विकता येतील इतकी अंडी होतात. त्यात मिळालेल्या नफ्यातून कोजो आणखी कोंबड्या विकत घेतो. त्यातून त्याच्या शाळेची फी भरण्याइतपत पैसा मिळतो. शाळेचे शिक्षण पूर्ण केल्यावर, त्याला मोठे कर्ज मिळते आणि तो हळूहळू एक पोल्ट्री फार्म सुरू करतो, तिथे काही मजूर कामाला ठेवतो आणि सरकारकडे कर जमा करतो. यातून समाजाचा विकासही होतो. कोजो इतरांना कर्जे देतो. त्यामुळे ते लोकही आपली गरीबी दूर करू शकतात.



हा कोजो आहे.



कोजोने जळाऊ लाकडाचा भार दोरीने गाठ मारून आपल्या डोक्यावर ठेवला. वडिलांच्या मृत्युनंतर शाळा सोडून तो लाकडे गोळा करून बाजारात विकण्यात आईला मदत करू लागला. दिवसभरातील हा शेवटचा भार घेऊन जाताना तो खूप थकला होता, भुकेला होता.

कोजो आईसोबत छोट्याशा मातीच्या झोपडीत राहात असे. उघड्या चुलीवर ते आपले अन्न शिजवत. झोपडीशेजारी एक बाग होती. तिथेच ते आपले अन्न पिकवत. त्यांच्याकडे ना फारसा पैसाअडका होता ना खायला पुरेसे अन्न होते.

कोजो घरानजिक पोहोचताच, त्याला आई बनवत असलेल्या फूफूचा (कंदापासून बनलेला पदार्थ) वास आला. मग तो जलद गतीने चालू लागला.





## हेच ते कर्ज, जे कोजोला मिळाले.



कोजो आणि त्याची आई घाणाच्या *अशांती* भागातील एका गावात राहात. गावातील सारी वीस कुटुंबे गरीब होती. पण त्यांच्याकडे एक चांगली प्रथा होती. प्रत्येक कुटुंब थोडेसे पैसे साठवून ठेवत असे. कुणी एक कुटुंब ही एकूण रक्कम कर्ज घेऊन स्वत:च्या कुटुंबाला आवश्यक असलेली वस्तू विकत घेत असे.

*अचेमपाँग* कुटुंबाने सर्वप्रथम कर्ज घेतले. त्यातून त्यांनी फळांच्या दोन पेट्या विकत घेतल्या. त्या बाजारात विकून त्यांनी काही नफा कमावला. त्यांनी आपले कर्ज चुकवले. मग *डुओडू* कुटुंबाने कर्ज घेऊन एक जुनी शिलाई मशीन विकत घेतली. त्यांना शर्ट आणि इतर पोशाख शिवून बाजारात विकायचा व्यवसाय सुरू करायचा होता.

मग कोजोच्या आईची पाळी आली. तिने कर्जातून जळाऊ लाकडे बाजारात नेण्यासाठी एक ढकलगाडी विकत घेतली. तिने ही ढकलगाडी भाड्याने द्यायचाही विचार केला.

आईच्या कर्जातून काही पैसे उरले. कोजोने स्वत:साठी काही विकत घेण्याचा विचार केला. त्याच्या डोक्यात एक कल्पना घोळू लागली.

कोजोने एक कोंबडी विकत घ्यायचे ठरवले. त्या कोंबडीने घातलेली काही अंडी तो आणि त्याची आई खातील आणि उरलेली अंडी ते बाजारात विकतील, असा त्याचा विचार होता. शेजारच्या गावात एक शेतकरी राहात होता. त्याच्याकडे बऱ्याच कोंबड्या होत्या. त्याच्याकडून एक कोंबडी विकत घेऊ, असे कोजोने ठरवले.

तिथे पोहोचायला कोजोला दोन तास लागले. तिथे पोहोचला तेव्हा तो घामाने भिजला होता, धुळीने माखला होता. एवढ्या सगळ्या कोंबड्यांमधून चांगली कोंबडी कशी निवडायची, असा विचार करून तो गोंधळला.

कोजोने सगळ्या कोंबड्यांना न्याहाळले. एक पांढरी कोंबडी त्याच्या पायाजवळ दाणे खात होती. ही कोंबडी घ्यायची का? एक ठिपकेदार कोंबडी पंख फडफडवून आवाज करत होती. हिला घ्यायचे का? मग कोजोला घरट्यात पंख पसरवून बसलेली एक गोंडस तपकिरी रंगाची कोंबडी दिसली. तिला अंडी घालायला आवडत असावे, असे दिसत होते. मग त्याने जास्त विचार केला नाही. आपल्याला अशीच कोंबडी हवी आहे, असे त्याला तीव्रतेने वाटू लागले.

कोजोने ती कोंबडी विकत घेऊन एका बांबुच्या टोपलीत ठेवली. टोपलीला एका कापडाने झाकून त्याने टोपली डोक्यावर ठेवली. घराकडे चालत असताना तो भविष्याची स्वप्ने पाहू लागला. त्याला खूप सारी अंडी दिसू लागली. काही खाण्यासाठी, काही विकण्यासाठी. नशिबाने साथ दिली तर तो अंडी विकून आणखी कोंबड्या विकत घेईल.

त्या रात्री त्याने कोंबड्यांची टोपली आपल्या बिछान्याच्या चटईनजिक ठेवली. तिथे ती अगदी सुरक्षित होती.



कोजोने आपल्या पहिल्या कर्जातून विकत घतेलेली कोंबडी.



कोजोने एका जुन्या वॉशिंग पावडर डब्यापासून कोंबडीसाठी घरटे बनवले. कोंबडीने त्यात अंडे घातले की नाही, हे तो रोज पाहू लागला. पहिल्या दिवशी त्याला काहीच दिसले नाही. दुसऱ्या दिवशीही काहीच नव्हते. पण ते काय दिसतेय? कोनाड्यात, चाऱ्याखाली, एक छोटेसे तपकिरी अंडे! कोजो खरंच नशीबवान होता. त्याच्या कोंबडीला अंडी घालण्याची हौस होती तर! पहिल्या आठवड्यात तिने पाच अंडी घातली. कोजो आणि त्याच्या आईने एक-एक अंडे खाल्ले. उरलेली तीन अंडी त्याने शनिवारच्या बाजारात विकण्यासाठी राखून ठेवली.

बाजाराच्या दिवशी, तो फळे, भाज्या, मांस, कपडे आणि भांड्यांच्या दुकानांमधून फिरला. त्याला आपली छोटीशी टोपली ठेवण्यासाठी आणि गिऱ्हाईकांना बोलावण्यासाठी एक चांगली जागा सापडली. कोजोने दोन अंडी आचेमपाँग बाईला तर एक अंडे डुओडू बाईला विकली. मिळालेले पैसे हरवू नयेत म्हणून त्याने मुठीत घट्ट पकडून ठेवले. मग तो टोपली घेऊन घराकडे चालू लागला. रस्त्यात त्याला आणखी एक खजिना सापडला– जमिनीवर पडलेले धान्याचे दाणे आणि फळांचे तुकडे. हा खाऊ त्याच्या कोंबडीला खायला देता आला असता.

हळूहळू कोजोची अंड्यांची कमाई वाढत गेली. दोन महिन्यांनी त्याच्याकडे आईचे कर्ज परत करण्याएवढे पैसे साठले. चार महिन्यांनी त्याने आणखी एक कोंबडी विकत घेतली. आता कोजो आठवड्याला पाच अंडी विकू लागला. तो आणि त्याची आई आता जास्त अंडी खाऊ लागले. सहा महिन्यांनी त्याने तिसरी कोंबडी विकत घेतली. आता तो आणि त्याची आई रोज एक अंडे खाऊ लागले. कोजोला आपल्या अंड्यांचा अभिमान होता. त्याच्या आईला कोजोचा अभिमान होता. एक छोटीशी कोंबडी हळूहळू एक मोठा बदल घडवत होती.



ही अंडी कोजोने विकत घेतलेल्या कोंबडीने दिलेली आहेत.

वर्षभरातच, कोजोकडे पंचवीस कोंबड्या झाल्या. त्याला खुराड्यातील कोंबड्यांचा आवाज सणावारीच्या ढोलपेक्षा बरा वाटे. पण एवढ्या साऱ्या कोंबड्यांची अंडी गोळा करणे, ही मोठी कटकट होती. ठिपकेदार कोंबडी तिचे अंडे लपवून ठेवायचा प्रयत्न करत असे. आज त्याला एक अंडे कंदाच्या रोपाखाली सापडले. जेव्हा तो घरटी तपासू लागला तेव्हा पांढऱ्या कोंबडीने त्याला चोच मारली. चमकदार तपकिरी कोंबडी मात्र अजूनही त्याची आवडती होती. ती नेहमी गुळगुळीत तपकिरी अंडे देत असे.

बाजारात अंडी विकल्यामुळे कोजोची थोडीशी बचत झाली. या पैशाने तो कदाचित कोंबड्यांसाठी छानसे लाकडी खुराडे बनवेल. कदाचित तो आपल्या आईसाठी पाण्याची नवीन बादली आणि चांगल्या दर्जाचा चाकू विकत घेईल. कदाचित या पैशाने तो आपले स्वप्न पूर्ण करेल, आपल्या शाळेची फी भरेल आणि शाळेत जाऊ लागेल.

“तुझ्या अंड्यांनी आपली तब्येत सुधारलीय, कोजो,” आई म्हणाली. “आता शाळेत प्रवेश घे आणि शिक....आपल्या दोघांसाठी.”





अंडी विकून आलेल्या पैशातून कोजोने या कोंबड्या विकत घेतल्या.




कोजोचा गणवेश कडक आणि नवीन होता. तो पायी चालत शाळेत जात असे. त्यावेळी त्याचे ओठही हलत असत. तो वर्णमालेतील अक्षरे आणि संख्या आठवायचा प्रयत्न करत असे. वडिलांचा मृत्यू होण्याआधीच तो हे सगळं शिकला होता.

शाळेत कोजो इतर मुलांसारखाच अभ्यासात आणि अंकगणिताचे प्रश्न सोडवण्यात खूप मेहनत घेत असे. नंतर तो निबंध लिहिण्यास शिकला, गणित आणि विज्ञान विषयांतील समस्या सोडवण्यास शिकला. तो त्याच्या देशाचा इतिहास, देशाची साधनसंपत्ती, आफ्रिकेतील तसेच जगभरातील इतर देश यांच्याबद्दल शिकला.

तो काही व्यावहारीक गोष्टीही शिकला जसे, पिण्याचे पाणी कापडातून कसे गाळायचे, भाज्या उगवण्यसाठी कचऱ्यापासून खत कसे बनवायचे. कोजोने शिकलेल्या या गोष्टींमुळे तो त्याच्या कोंबड्यांची आधीपेक्षा जास्त चांगली काळजी घेऊ लागला.

आता कोजो आणखी मोठी स्वप्ने पाहू लागला. पण ती प्रत्यक्षात येण्यासाठी आपल्याला आणखी शिकावे लागेल, हे तो जाणत होता. कोजोने आणखी मेहनत घेऊन अभ्यास केला आणि शेतीचा अभ्यास करण्यासाठी एका शेतकी महाविद्यालयाची शिष्यवृत्ती मिळवली. तो दूर गेल्यावर त्याच्या कोंबड्यांची काळजी आई घेणार होती.

कॉलेजात कोजोची स्वप्ने साकारू लागली. आता तो स्वतःची शेती करू इच्छित होता.

कॉलेजचे शिक्षण संपल्यावर कोजोने एक मोठा धोका पत्करायचे ठरवले. त्याच्याकडे आणि आईकडे असलेले सर्व पैसे एकत्र करून पोल्ट्री फार्म सुरू करायचा, असे त्याने ठरवले. त्याने एक मोठी जमीन खरेदी केली आणि कोंबड्यांची खुराडी बनवण्यासाठी सोबतच पुरेशी लाकडे व तारासुद्धा. आता त्याला फार्म सुरू करण्यासाठी नऊशे कोंबड्या खरेदी करायच्या होत्या. त्यासाठी त्याला मोठे कर्ज काढावे लागणार होते.

यावेळी कोजो जवळच्या कुमासी शहरातील एका बँकेत गेला. कोजोला नऊशे कोंबड्या खरेदी करण्यासाठी कर्ज हवे आहे, हे ऐकून बँकेने नकार दिला. एका गरीब कुटुंबातील मुलाला कर्ज द्यायला बँक तयार नव्हती.

पण कोजोने माघार घेतली नाही. तो राजधानी आक्रा येथील बँकेच्या मुख्यालयात गेला. दिवसभर वाट पाहून बँक बंद होण्याची वेळ झाली तेव्हा शेवटी त्याची अध्यक्षांशी भेट झाली. पण त्यांनी कोजोला फार वेळ दिला नाही. ते खूप व्यस्त माणूस होते.

कोजोने बँक अध्यक्षांना सांगितले की त्याने शाळेचे शिक्षण घेतले आहे आणि तो खूप मेहनतही घेईल. त्यांनी अशा कहाण्या बऱ्याचदा ऐकल्या होत्या. मग कोजोने आपण छोटे कर्ज घेऊन कोंबड्यांचा कळप कसा तयार केला, याची रोचक कहाणी सांगितली.

बँक अध्यक्ष आपल्या खुर्चीत रेलून बसले. ते त्यांची बोटे वाजवू लागले. अशी गोष्ट त्यांनी यापूर्वी ऐकली नव्हती. त्यांनी स्मित केले आणि मान डोलावून कोजोला कर्ज देण्यास होकार दिला. मग दोघांनी हस्तांदोलन केले.

घरी परतून कोजोने कोंबड्या खरेदी केल्या. लवकरच त्याच्याकडे एवढी अंडी असतील की त्यांना गोळा करण्यासाठी त्याला काही मदतनीस लागतील.

कॉलेजचे शिक्षण आणि बँकेतून मिळालेले कर्ज यांच्या जोरावर कोजोने हा फार्म उभा केला.





हे कोजोचे कुटुंब आहे.
फार्ममधून होणाऱ्या कमाईतून
तो आपल्या कुटुंबाचे
पालनपोषण करतो.



कोजोच्या कोंबड्या अंडी देण्यात कुशल होत्या. त्या गावातील लोकांच्या गरजेपेक्षाही जास्त अंडी देत. म्हणून मग कोजो कुमासीला जाऊन दुकानदारांना अंडी विकू लागला.

एका दुकानदाराचे नाव होते, *लुमो.* कोजो त्याला चांगला ओळखत होता. कोजोचे वडील आणि लुमो एकाच गावात वाढले होते. त्यामुळे ते चांगले मित्र झाले होते. कोजो लुमोच्या दुकानात सर्वात शेवटी जात असे. कधी कधी तो रात्रीचे जेवण तिथेच घेत असे. त्याला आपल्या वडिलांच्या गोष्टी ऐकायला आवडत असे. तसेच त्याला लुमोची मुलगी बनवत असलेला शेंगदाण्याचा रस्सा आणि ताडाच्या तेलाचे सूप चाखायलाही आवडत असे.

तिचे नाव होते, *लुमुसी.* ती शिक्षिका होती. तिला कोजोसारख्या मुलांच्या बऱ्याच कहाण्या माहीत होत्या. या मुलांची स्वप्ने मोठी होती आणि त्यांना शिकायचे होते. कोजोला या कहाण्या आवडत आणि त्या ऐकायला तो वारंवार तिथे जात असे. लुमुसीच्या कहाण्या दररोज ऐकाव्यात, असे त्याला वाटे. एकदा त्याने तिला लग्नाची मागणी घातली.

लुमुसी कोजोशी लग्न करण्यास आणि त्याच्यासोबत फार्मवर काम करण्यास तयार झाली. लवकरच कोजो आणि लुमुसी आई-बाप झाले. वर्षे सरली तसे त्यांना तीन मुलगे आणि दोन मुली झाल्या. सगळी मुले सुदृढ आणि हुशार होती. अंड्यांच्या विक्रीतून झालेल्या कमाईतून त्यांनी विटांचे एक मोठे व पक्के घर बांधले. कोजोची आईही त्यांच्यासोबत राहून बागेची काळजी घेऊ लागली. तिला पुन्हा कधी जळाऊ लाकडे विकण्याची गरज भासली नाही.

थोड्याच काळात, कोजोच्या शेतावर अनेक लोक काम करू लागले. पुरुष लोक कोंबड्यांना दाणे टाकत आणि त्यांची खुराडी साफ करत. बायका अंडी गोळा करत आणि ती खोक्यांमध्ये ठेवत. काही लोक अंडी कुमासी आणि आक्रा येथील बाजारपेठांत घेऊन जात.

मजुरांचीही कुटुंबे होती. एकंदर एकशेवीस लोक कोजोच्या शेतावर मजुरी करून आपला उदरनिर्वाह चालवत. पोल्ट्रीमुळे *ओडोंकर*सारख्या कुटुंबांला खायला पुरेसे अन्न मिळू लागले, त्यांच्या मुलांच्या शाळेची फी भरायला पुरेसे पैसे मिळू लागले. त्यांची मुलगी *आदिका* आजारी पडल्यावर आई ओडोंकर तिची औषधे विकत घेऊ शकले. वडील ओडोंकर त्यांच्या घराच्या मातीच्या भिंती पुन्हा नव्याने विटांनी बांधू शकले. कुटुंबाला काही खास दिवशी घालण्यासाठी ते नक्षीदार कपडे खरेदी करू शकले.

कोजोच्या शेतावरील मजूर आपले स्वत:चे पशुधन खरेदी करू शकले. काही कुटुंबांनी बकऱ्या खरेदी केल्या तर काहींनी मेंढ्या. काहींनी एका तपकिरी कोंबडीपासून सुरुवात केली.



## कोजोच्या फार्मवर काम करणारे लोक





कोजो आपली अंडी विकू लागला, आपल्या मजुरांना वेतन देऊ लागला तसे तिथे एक शहर वसू लागले.

कोजोचे शेत आता घाणातील सर्वात मोठ्या आकाराचे झाले. त्याचे शहरसुद्धा वाढत गेले. काही लोक शेतावर काम शोधण्यास येऊ लागले आणि तिथेच घर बांधून आपल्या कुटुंबासोबत राहू लागले. काही लोकांनी शहरात दुकाने सुरू केली आणि ते मजुरांना दैनंदिन सामानाची विक्री करू लागले.

एके दिवशी, कोजो आपले हिशोब तपासत होता. त्याने दारावर ठकठक ऐकली. दारात आदिका ओडोंकर होती. ती आता मोठी झाली होती. तिने कोजोला शुभेच्छा दिल्या आणि नाण्यांची एक छोटी थैली दाखवली.

तिने कोजोला सांगितले की ते पैसे तिने आपल्या वेतनातून वाचवले होते. त्यात थोड्या पैशांची भर घालून तिला धान्याची चक्की खरेदी करायची होती. तिला लोकांचे धान्य दळून पीठ बनवण्याचा व्यवसाय करायची इच्छा होती. तिला कोजो छोटेसे कर्ज देऊ शकेल का?

कोजो आदिकाच्या कुटुंबाला चांगले ओळखत होता. त्यांनी अनेक वर्षे शेतावर एकत्र काम केले होते. कोजोला ही कल्पना आवडली. पण त्याने आदिकाकडून वचन घेतले की कधीतरी ती दुसऱ्या कुणा कुटुंबाला कर्ज देऊन मदत करेल.

आदिकाने मान्य केले आणि जसजसे लोक इतरांना मदत करू लागले तसतसे शहरातील बऱ्याच कुटुंबांच्या आणि त्यांच्या मुलांच्या आयुष्यात सुधारणा झाली. मुलांना पुरेसे अन्न मिळू लागले, ते शाळेत जाऊ लागले, त्यांचे आरोग्य सुधारले.

वर्षे जाऊ लागली तसे कोजोचा पोल्ट्री फार्म पश्चिम आफ्रिकेतील सर्वात मोठा फार्म बनला. कोजो आता म्हातारा झाला. त्याला नातवंडे झाली. त्याची नातवंडे नेहमी फार्मवर येत आणि अंडी गोळा करण्यात त्याला मदत करत. “हे अंड कुठे जाणार? ते अंड कुठे जाणार? असे ते कोजोला विचारत.”

“ते माली देशाची राजधानी *बामाको*ला नाहीतर बुर्किना फासो देशाची राजधानी *वागडूगू*ला जाईल,” कोजो उत्तर देत असे. कोजोचे मजूर दिवसभरात हजारेक अंडी खोक्यांमध्ये भरत. अंड्यांनी भरलेला ट्रक आजुबाजुच्या देशांतील कुटुंबांची अन्नाची गरज भागवण्यासाठी निघत तेव्हा त्याला खूप अभिमान वाटत असे.

कोजो घानाच्या सरकारला मोठ्या प्रमाणात कर देत असे. त्याचे मजूर आणि अंडी विकणारे दुकानदारसुद्धा कर भरत. कराच्या रकमेतून सरकार रस्ते, शाळा आणि आरोग्यसुविधा पुरवत. आक्रा येथील बंदर सुधारण्यासाठी सरकार या कराचा वापर करत. या बंदरात विविध देशांची जहाजे व्यापार करण्यासाठी येत.

आणखी एक अंड्यांचा ट्रक निघून गेला. कोजोने त्याच्या सर्वात धाकट्या नातवंडाकडे पाहिले. पुढच्या वेळी मुलांनी कोजोला विचारले की अंडे कुठे जाणार, तर कोजो म्हणेल, “तुझ्या भवितव्याकडे, माझ्या मुला.”






हाच तो देश आहे ज्याने
कोजो आणि आदिक
यांसारख्या लोकांच्या
व्यवसायाची भरभराट केली.





या सगळ्यांनी एक
तपकिरी कोंबडी विकत
घेण्यासाठी छोटेसे कर्ज
घेतले होते.



अशा तऱ्हेने कोजो नावाच्या एका लहान मुलाने एक तपकिरी कोंबडी विकत घेण्यासाठी छोटेसे कर्ज घेतले. यातून त्याने आपले कुटुंब, आपला समाज, आपले शहर आणि आपल्या देशाचे जीवनच बदलून टाकले.

एका लहानशी कल्पना आणि एक छोटेसे कर्ज यांतून हे सर्व साकार झाले. हे सर्व एका कोंबडीपासून सुरू झाले.



## खरा कोजो

ही कहाणी घाणाच्या अशांती भागातील हुशार *क्वाबेना डार्को*ची आहे. त्याच्या लहानपणीच त्याच्या वडिलांचा मृत्यू झाला आणि तो आपल्या आईला घर चालवण्यासाठी मदत करू लागला.

क्वाबेनाचा जन्म एका गरीब कुटुंबात झाला. ते मध्य घाणाच्या कुमासी शहराजवळ असलेल्या एका छोट्याशा शहरात राहात. तो लहान असतानाच त्याने आपले वडील गमावले. मग त्याने वस्तुंची खरेदी-विक्री करून शाळेच्या फीचे पैसे जमवले आणि आपल्या कुटुंबाला मदत केली. कधीकधी क्वाबेनाच्या कुटुंबाला एखाद्या दिवशी खायला काही मिळेल की नाही, याची शाश्वती नसे.

क्वाबेनाच्या आईने एका लहानशा पोल्ट्री फार्मच्या मालकाशी लग्न केले, तेव्हा क्वाबेनाला कोंबड्यांची देखभाल कशी करायची, हे शिकायला मिळाले. त्याला पोल्ट्री विज्ञानाचा अभ्यास करण्यासाठी इस्राईलमधील एका कॉलेजची शिष्यवृत्ती मिळाली. मग 1967 साली, त्याने आपल्या आयुष्याची सर्व पुंजी, 1000 डॉलर, जमीन आणि कोंबड्या खरेदी करण्यात गुंतवली. कोजोसारखेच, त्यालाही कर्ज हवे होते आणि ते मिळवण्यासाठी त्यालाही बँकेत संघर्ष करावा लागला.

हळूहळू क्वाबेनाचा व्यवसाय वाढू लागला. त्याला यश मिळाले त्याने अनेकांना आपला स्वत:चा व्यवसाय सुरू करण्यासाठी कर्जे दिली. कारण बँक अशा लोकांना कर्जे देण्यास तयार नसतात, हे त्याला माहीत होते. म्हणून त्याने “मस्टर्ड सीड” नावाची संस्था स्थापन केली. ती छोटी कर्जे देत असे, 2000 डॉलर इतके. ही छोटी कर्जे मोठे बदल घडवून आणत.

एक कोंबडी

ही एक प्रेरणादायी गोष्ट आहे. एका छोट्याशा कर्जाचा किती प्रभाव पडू शकतो, हे यात वाचायला मिळते. कोजोची गोष्ट एका खऱ्या व्यक्तिवर आधारीत आहे. क्वाबेना डार्को, या व्यक्तिने खऱ्या आयुष्यात आपल्या समाजात बदल घडवून आणला. आता तो मायक्रो-क्रेडिट उपक्रमातून इतरांच्या आयुष्यात बदल घडवत आहे.

